महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी या विद्यापीठास ०४, निवृत्तीवेतनविषयक खर्चाकरीता निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: मफुवि-१४२४/प्र.क्र.२०२/७-अे,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार,मुंबई-४०० ०३२.
**दिनांक: २४/०२/२०२५.**

**वाचा :** १) कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्र.मकृषि-१२१५/प्र.क्र.७७/६ अे, दि.२०.०२.२०२४.
२) नियंत्रक,महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी यांचे पत्र जा.क्र.मफुकृवि/नियंत्रक/लेखा-२/८७४/२०२४, दि.०५.११.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:-**

उपरोक्त वाचा क्र.०१ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील चारही कृषि विद्यापीठातील शिक्षकवर्गीय कर्मचाऱ्यांचे सेवानिवृत्तीचे वय ६२ वर्षे वयावरुन ६० वर्षे करण्यात आले आहे. त्यामुळे निवृत्तीवेतनधारकांच्या संख्येत वाढ झाली आहे. सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांना निवृत्तीवेतनविषयक लाभ अदा करण्याकरीता, तसेच, ७ व्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने सुधारित निवृत्तीवेतन अंशराशीकरण लाभ अदा करण्याकरीता, त्याचप्रमाणे सुधारित १२/२४ आश्वासित प्रगती योजनेचे लाभ अदा करण्याकरीता निधीची आवश्यकता असल्याने महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी या विद्यापीठास अनिवार्य खर्चाखालील २४१५ ००२५ या लेखाशिर्षातंर्गत ०४,निवृत्तीवेतनविषयक खर्च या बाबीकरीता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या तरतूदीव्यतिरीक्त अधिकचा निधी पूरक मागणीद्वारे उपलब्ध करुन देण्याची विनंती नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांनी वाचा क्र.२ येथील पत्रान्वये केली होती.

त्यासअनुसरुन, वित्त विभागाने विधानमंडळाच्या सन २०२४ च्या माहे डिसेंबर च्या हिवाळी अधिवेशनात महात्मा फुले कृषि विद्यापीठास ०४,निवृत्तीवेतनविषयक खर्चाकरीता २४१५००२५ या लेखाशिर्षाखाली रु.४०१०.९५ लाख इतक्या अतिरिक्त निधीची पुरवणी मागणी मंजूर केली होती. सदर पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला निधी महात्मा फुले कृषि विद्यापीठास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात, महात्मा फुले कृषि विद्यापीठास मागणी क्र. डी-३, ०१ पिकसंवर्धन,१२० इतर संस्थांना सहाय्य, (००)(०१) महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (अनिवार्य), (२४१५ ००२५) ०४,निवृत्तीवेतनविषयक खर्च या बाबीकरीता एकूण रु.४०१०.९५ लाख इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.०१.०७.२०२४ व दि.२५.०७.२०२४ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित/शिल्लक राहीला/राहणार असेल तर सदर अखर्चित/शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी/योजनांसाठी/ बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च सन २०२४-२५ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सहायक लेखाधिकारी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१),१९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार, तसेच, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६/ २०२५/व्यय-१, दि.०५/०२/२०२५ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०२२४१४४८५६४३०१ असा आहे, हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Agricuture and Adf Deparment, 2.5.4.20=4367a98b1913c401683f04d0604dddbf6104bd9b26a678a0c12daf8bc922cfea, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60ae0791d92611a135ce51a5ee439203fdbdb395146d132620b3437eded658ce, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2025.02.24 14:50:02 +05'30'

**( मिताली चौधरी )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
३. प्रधान सचिव (कृषि),कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.
४. महासंचालक,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.
५. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी.
६. वित्तीय सल्लागार,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.

७. सहायक लेखाधिकारी,महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी.
८. महालेखापाल,महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, अहिल्यानगर/ उपकोषागार अधिकारी,राहुरी.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
११.मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१२.उप मुख्य लेखापरीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१३.उप सचिव, वित्त विभाग (व्यय-१/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई.
१४.उप सचिव, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई.
१५.उप सचिव,कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.